अथवा पिंगलवेषः कश्चिदन्विष्य स

कावसरः. समापितव्या मया रामकथा.

रुदतीमिमां सुंदरीं.

रामः— पश्याम्येव.

मकरंदकणाट्टगञ्जयौ, मुखचंद्र

मम हिद्रवयंति मानसं मदिराक्ष्या

मारी०— ( ध्यानं नाटयति )

एका.—

उप्पलिणीए विअसे एदाएणं सुह

जइपरिरंभइस्सदि राआचंदोव्व

रामः

रोमांचयति ममांगं वचनमिदं च

अथवा पिंगलाच्या वेषानें येथें माझ
गेला असावा. असो, हा आतां शोक
नाहीं. रामाची कथाच समाप्त केली प
पहा सख्या, ही तरुणी कशी रुदन करी
**राम.**-- होय पाहतोंच आहें.

**आर्या.**

दृगब्जमकरंदचि हा, वदनेंदूचे सुध
हरणाक्षीच्या अश्रुंसि पाहुनि मदृष्ट
**मारीच.**— ( ध्यान करितो ).
**एक सखी.**—

**आर्या**

उत्पलिनीपरि हिजला सुख होइल व
स्वकरांहीं हिजला जरि चंद्रापरि र
**राम.**—

**आर्या.**

ऐकुनि सखी वचोमृत हें पुलकित
नूतन मेघजलानें कुड्मलयुत ते क

अतएवंब्रवीमि. ( प्रकाशं ) वयस्य रा

थंपरिजनः; नह्यस्मिन्नरण्येतत्संभवः;

रामः— ( स्वगतं ) कथमस्यपूर्वापरविरुद्ध

ज्ञाय तद्वृत्तांतवेदिनं काश्यपमानेतुंगतः,

माया स्यात् ॥( प्रकाशं ) अपिश्रुतं पिंग

मारीचः. ( रामंप्रति जनांतिकं )

मन्येहं पिंगलो भूत्वा मायावी

ताटका द्रौहिणंहंतुं त्वामन्यत्रनि

रामः— युक्तमाहभवान्. पिंगलः पुनरिहागतश्चे

आहे. म्हणून मी आतां असें म्हणतों.
सख्या **रामभद्रा**, ही स्त्री दिसते ती **जान**
च्या सख्या नव्हत, कां कीं या अरण्यांत त्यां
नाहीं, तर ही सर्व माया आहे असें मला वाट

**राम.**— ( मनांत म्ह० ) काय हो याचें हें अ
घां काय बोलला आणि आतां काय बो
अशी प्रतिज्ञा गाऊन तें वृत्त **का**श्यपाला
त्याला आणायास गेला. आणि आतां ही
आहे असें म्हणतो. दुसरें, परिवारासुद्धां
च माया कसी होईल ? ( मोठ्यानें म्हण
**पिंगल** काय म्हणतो हें ऐकिलें ना ?

**मारीच.**— ( **रामा**च्या कानांत म्ह० )

### श्लोक.

तूं मारिलें जाणुनि **ताटि**केला, निशाचें हा
कोठें तरी नेउनियां तुला हा इच्छी वधूं, व

**राम.**— ( **मारी**चाप्रत म्ह० ) तूं बरोबर बोलि
जर खरा **पिंगल** पुनः परत येथें आला

**पिंगल**—(भयानें व शोकानें मनांत म्ह०) हा
केंच राम मला समजतो असें नव्हे, तर आ
सें समजतो ! अरेरे ! चहाडचा सांगून का
झा घात केला ! हरहर ! काय करावें ? (मोठ्य
कोण आहें, काय म्हणतों, याचा नीट पक्का
म्हणून खिन्नवदन होऊन उभा राहतो ).

**मारीच**— ( ध्यान करितो ).

**मायासी०**— ( एके सखीचे बोलण्यावर म्ह०
गिनीला दुर्लभ आहे !

**राम.**—

## श्लोक.

माझागे परिरंभ दुर्लभ तुला आहे कसा
ज्या तूझे कुच कांचनाब्जकलिकासुस्नि
जो नीलोत्पलगर्वहारक असा नेत्रांत तेणें
पाहाशी मजला सुचंदनरसें तपास वो सुंद

**मारीच**—( मनांत म्ह० ) हिच्या ठिकाणीं ह्याच
स्थिर झाला ! आतां आपलें इच्छित जें आहे
ण नाहीं. (मोठ्यानें म्ह०) वयस्या, त्वां

अंक २.

**मारीच**— ( ध्यान करितो. )

**दुसरी स**०—( मायासीतेप्रत म्ह० ) दुर्लभ कां
क महर्षी हे तुझा वल्लभ तुला आणून देती
नाहीं.

**राम**.— ही गोष्ट पिंगलमुखापासून मघांच ऐकि

**पिंगल**.— अहो काय आश्चर्य ! झालेली गोष्ट थे
दून दाखविण्याविषयीं मायेच्या कौशल्याची

**मारीच**—(रामाप्रत म्ह० ) हा काय म्हणतो हें

**राम**.—अरे काश्यपा, याचें बोलणें आपण ऐकूं

**काश्यप**— ( झाडाच्या आडून ती माया पाहून
वास्तविक सख्यांप्रमाणेंच ह्या परस्पर बोलत
यांतून कांहींच खरें वाटत नाहीं !

**मारीच**.— ( ध्यान करितो )-

**एक स**०— अगे तूं म्हणतेस तें खरें. पण दुशा
णून मोठी चिंता उत्पन्न झाली आहे !

**काश्यप**.— ही एक खोटी गोष्ट ! कां कीं अ
नकापाशीं मागणें केलें नाहीं.

**मायासी**.—( डोळ्यांस आसवें आणून) अगे
मागतो काय ? बाबानें मला त्याजकारणें दिलें
ईन अथवा अग्नींत उडी टाकीन! राहणार न

**राम**.— ( आनंदानें आणि प्रेमानें म्ह०).

## आर्या.

भाव हिचा मजवरिची, अन्या न शिवे कद
मदत्हृदया विकतचि घे मौल्या दे प्रीतिची

( असें म्हणून पाहत उभा राहतो.

**काश्यप**.—(करालास पाहून हर्षानें म्ह०) बरें
मजकडे येत आहे! अरे **पिंगला**, **राम**भद्र
शोधून काढिलें कीं नाहीं ?

**कराल**.—शोधून काढिलें इतकेंच नाहीं, तर त्या
मी त्याला एके वनांतून दुसरे वनांत, दुसरे वनांत
सें चाळवीत चाळवीत येथें आणिलें आहे. प
तुझी वाट पाहिली तरी तूं दिसेनास, म्हणून
वरून लक्ष्मणानें तुला मारून टाकिलें, अशी
माझ्या मनाची काय जी अवस्था झाली ती
येत नाहीं.

**काश्यप.**— काय ही **सीताच** आहे असें तुला

**कराल.**—( हांसून म्ह० ) तोंडानें **सीता** असें

ही सर्व तुझी माया आहे हें मी जाणतों.

**श्लोक.**

इंद्रजिच्छंबर, तसा **विद्युज्जिव्ह, मय**

त्यांहून **ताटिकापुत्रा** माया तूझीच दुस्त

**काश्य०**-(उद्विग्न होऊन मनांत म्ह०)अरे हा कोणी

सेवक आहे. आणि **मारीच** हा माझें रूप घेऊ

प्रयोग करीत आहे असें आतां समजलें !

**श्लोक.**

अरे काय करूं आतां **राम** राक्षस मा

व्याघ्राच्या जवळी आला मृगकैसेनि वां

( असें मनांत चिंतून मूर्छित होतो. )

**कराल.**--सावध हो सावधहो ! जननी **ताटिका**

व त्या राजपुत्राचा पराक्रम मनांत आणून दुःख

पुरे कर ! शोक व दुःख करून बाबा आतां क

( असें म्हणून सावध करितो. )

**काश्यप.**—( सावध होतो आणि उभा राहून हात

**आर्या.**

राक्षसराय, तुम्हांला नमितों बहु, मी नव्हेचि

रक्षावें या दीना, पावावी शाश्वतिक सुकीर्ति

**कराल.**—अरेरे ! हा तर ब्राम्हणाचा पोरगा आहे

मूर्ख, कीं यालाच **मारीच** असें समजून सर्व गु

च्या जवळ बोलिलों ! ( शोकाच्या अवेशानें म्ह

अंक ३.

## आर्या.

मेला मारीच असें पूर्वी म्या कल्पिलें
व्यग्रत्वें करुनि, परी झालें परमार्थ[1] की
हा मारीचा, हा विविधमायासंप्रदायगुरो,
बोलून ) आतां ही व्यर्थ बडबड करून का
गर्वानें म्ह० ) रे सुमित्रागर्भदाहका, रे क्षत्रि
कें बोलून विचार करून म्हणतो)अरे त्याचें

## श्लोक.

रामापरी लक्ष्मण शूर आहे; त्याचें मला द
या काश्यपालाच अतां वधावें, मारीच वैरा
( असें म्हणून काश्यपाच्या नरडीस
काश्यप.— ( त्याच्या हातून निसटून, आंच्या
वसला होता त्याजवळ धांवत जातो ).
कराल.— ( त्याच्या पाठीस लागतो ).

काश्यप **आर्या.**

मारीचसेवक बळी राक्षस हा मारण्या

**मारीच**— ( हर्ष पावून मनांत म्ह० ) होयरे
खरा. आणि त्याच्या मागून येत आहे तो **का**
म्ह० ) पहा हा **मारीचाचा सेवक** माझें रूप
**काश्यप**— सख्या **रामभद्रा**, तुजपाशीं ज
द्रूपधारी **मारीच** होय बरें ! हाच ही मा
तुला मोहांत पाडीत आहे !
**कराल**— ( हर्षानें मनांत म्ह० ) दैव थोर कं
**मारीच** जिवंत आहे ! ( मोठ्यानें म्ह०
खिन्नवदन होऊन कोण बरें उभा आहे ?
**मारीच**— हा राक्षस ह्मणून मित्रानें मघांच
**पिंगल**— ( **काश्यप**ाचे जवळ जाऊन )
त्वद्रूपधारी **मारीच** यानें मला **कराल**
गोष्टी केल्या, यावरून हा माझें रूप धार
होय. त्यानेंच **रामा**च्या गळ्यांत मिठी
**राम**— ( मनांत म्ह० ) हा तर **काश्यपाल**
आणि **जानकी** व तिच्या सख्या दिसत
असें म्हणतो. हें मोठें आश्चर्य आहे ! (

**श्लोक.**

यांत दोघे **पिंगल** हे, दोघे **का**
त्यांत दोघे मित्र माझे, दोघे राक्ष

**कराल व मारीच**— ( **पिंगल** व **का**

**श्लोक.** ( अर्धा ).

या राक्षसांते, सखया, टाक

**राम.**— ( क्रोधानें धनुष्यावर बाण चढवितो
**काश्यप**— ( राहिलेला अर्धा **श्लोक** म्ह

**राम.**— ( मनांत ) हें कसें ब्वा !

## आर्या.

हे माझे मित्र असें यांची वाणीच सांगते
परि त्हदया, कैसी रे ईर्षा त्यांचीच वाटले
ज्यांनां राक्षस ह्मणुनी माराया बाण लावि
त्यांविषयीं दृष्टि, पहा ! माझी करुणार्द्रत

( असा विचार करीत उभा राह

**मारीच**—( मनांत म्ह० ) काय ! हा **राम** यांच
शंका पावत आहे ! बरें असो. ( असें ह्मणून

**एक सखी.**— ( पडदा एकीकडे सारून घ
आणि ह्मणते ) अगे बायानों, घात झाला गे

( हें ऐकून साऱ्याजणी घाबरता

**आलेली सखी.**— अगे घात झाला ! अप्रिय

**साऱ्याजणी.**— कोणती अप्रिय वार्ता असेल
ऐकिल्यावर मग जें कर्तव्य असेल तें करूं

अंक १.

**सरळ्या.—** अगे बायानों, हा तर अणखी मोठ
हाय ! आतां काय करावें ?

( असें बोलून **सीते**च्या पाठोपाठ धां

**राम.—** ( धावऱ्यां धावऱ्यां जवळ जाऊन म्ह०
भिऊंनको ! भिऊंनको ! **दशकंठ** धरून
देखील भिऊं नको बरें ! धीर धर ! धीर धर

## आर्या.

दोघां निशाचरां या छेदाया बाण लाविल

**कराल—** ( भयानें **मारी**चाचे कानांत म्ह० )
करील कोण जाणे ! ( विचार करून म्ह० )
कशास, या दोघां ब्राह्मणांच्या पोरांस उद्देशून

## आर्या. ( उत्तरार्ध ).

**राम.—**

येणेंचि मारितों त्या,' ज्यानें वधिला **विदेहर**

**काश्यप—** **विदे**हराजाला वधिलें ही गोष्ट

**श्लोक.**

वज्रापरी घायहि जे हतांचे, होतांच, **ऐराव**
मागें फिरे तो जंव रे भयानें, ओढी तया **रा**
हें पाहुनी देवहि भीत झाले, होऊनियां दीन
त्या **राव**णाचा वध फार सोपा, ऐसेंचि हां मा
**रामा** रणीं जिंकिल आजि ऐसा, नाहीं त्रिलो
नाहीं गती नीट पुढें कुलाची, ही जाण बा निश्चि

**पिंगल**—( **काश्यप** वचनावर ह्म०) यांत का
**कराल** व **मारीच**— ( भय पावून उगेच पाह
**मारीच**— या दोघां राक्षसां शीघ्र सखया टाक
र्ध ह्मणून ध्यान करितो ).
**काश्यप**— ( श्लोकाचें उत्तरार्ध म्हणतो ).
सख्या, **मारीच**माया ही कर कार्या वि
**मायासी०**— या वनांत झाडांशीं झाडें घांसून
ह्या मोठ्या शिळेवर चढून त्यांत उडी घालि
**राव**जीचें वर्तमान ऐकून जो शोक झाला
पुरुषाचेठायीं अतिशय अभिनिवेश उत्पन्न
ज्या मदनज्वरानें जाळून टाकिलें, तो मदन
ति होईल ! ( असें म्हणून निघून जाते. )
**पिंगल** व **काश्यप**.—( मनांत म्ह० ) **मा**
ही गोष्ट घडली.
( मोठ्यानें म्ह० ) सख्या, **मा**रीचमाया ही
**राम**.—येथें विचार तो कसला करायाचा आहे

**श्लोक.**

प्रेमें स्मरोनि मजला उडी अग्नींत घ
**सीता** जें बोलिली तें, हो, मन्मम

**कराल.**—मित्रा, 'मायाप्रयोग हा मायाप्रयोग हा
करितो ती करो, पण
या दोघां राक्षसां शीघ्र, सखया, टाक
( हे श्लोकार्ध पुनः म्हणतो ).

**सख्या.**—(**माया**सीते प्रत म्ह०) **जनकरावर्ज**
तसेंच आम्हा सर्वांनांही आहे. असें असून अ
कशीगे पुढें गेलीस ! थांब थांब, ह्या आह्मी तु
तर आम्हांला येऊंदेगे ! तूं एकटीनेंच भलती
ह्माला जें आणखी एक विशेष दुःख होईल, तें
अगे हायहाय ! तिनें अग्नीत उडी टाकिली दे
वत्सले, हा विदेहकुलमंगलदीपिके, ( असें अ
अगे आतां रहून काय हें दुःख नाहींसें होतें
सखीनें उडी घातली, त्याच अग्नीत आपणही
( असें बोलून सान्या निघून जातात

**राम.**—अरेरे ! काय दुःखाची गोष्ट ही ! (धनुष्या
पित्याचे शोकास्तव तिनें असें केलें. त्यामुळें

## श्लोक.

झाला भग्न अतां मनोरथ तरू माझा अ
पृथ्वीचा,नयनोत्सवौघ, विधिची सत्कीर्ति
झाला भग्न तसा त्रिलोकजयि जो त्या
प्रेष्टा[२] गेलि जळोनि यास्तव मना कांहीं

**मारीच.**—( मनांत ह्मणतो ) **रामाचे** शोकाग्नी
देतों आतां. ( मोठ्यानें ह्मणतो) काय ! हिनें
ली कीं ! अरेरे ! हे देवयजनसंभवे, हे विदेह

यंदशेति किमुच्यते त्वयिदैवतु

(इतिमूर्च्छ

करा०— ( मारीचंप्रति ) काश्यप

रामः— किं काश्यपएव प्रथमं प्रसु

पतामि किमहं गिरेः। किमुवि

तनुंविदलयामिकिं। कवलयामि

करा०— (स्व०) अरेरे क्षत्रियबटो

मारीचंप्रति ) काश्यप, कापुनरा

मारीचः ( समाश्वस्य ) यापुनर्वयस्य

रामः— विदेहनृपकन्यकामनुपतामि

मारी०— ( स्वगतं ) एवंक्रियतां, य

असी दशा व्हावी काय ! हा दुर्दैवानें तुजवर

( असें ह्मणून मूर्च्छित होतो.

**कराल.**— ( मारीचाप्रत ) **काश्यपा,** साव

**राम.**— काय ! **काश्यपा**लाच पहिल्यानें मूर्च्छ

चे आवेशानें ).

**श्लोक.**

गिरीवरुनियां पडूं, जलनिधीमधें वा बुडूं

चिरूं किं जड हें वपू, पिउं विषास किंवा

**कराल.**—(मनांत ह्मणतो) अरे क्षत्रियाचे पोरट्य

**ताटिके**ला व **सुबाहू**ला विचार. ) मोठ्य

**काश्यपा,** मग आपली गति कशी रे ?

**मारीच.**— ( सावध होऊन ह्मणतो ) जी मित्र

**राम.**—

**श्लोक.** ( तृतीयचरण ).

अनुव्रजन कीं करूं **जनकजे**सवें पाव

**मारीच.**—( मनांत म्हणतो ) असेंच कर आणि

## श्लोक.

निजूनि राहे नवपल्लवावरी, सख्याहि सेवा क
शशांकलेखे परि सूक्ष्मउज्ज्वला सुलोचना निि
सख्या, अतांची मम लोचनांला दिलें जिनें प
तिचा कसा यापरि अंत झाला! अशक्य हें, बा
तर आतां ह्या काळ्या मोर शिळेवर चढून
करितों. (असें म्हणून शिळेवर पाय ठेवितो ).

**काश्यप व पिंगल.**—( एकमेकाजवळ ह्म०
राक्षसानें आपणास फसविलें! कौशिक का
कळलें, तर ते याचें निवारण करितील. पण
कोण सांगेल आतां? (असें म्हणून उगेच पा

**मारी०**—( मनांत म्ह० ) हॉं आतां आपलें क
तिशयामुळें मान न राहतां मोठ्यानें ह्मणतो
राला, पाहतो आहेस ना ?

## आर्या.

सीतानुगमार्थ कसा शिळेवरी देतसे पद
राक्षसवधपापी हा, गेला सिद्धीस आपुला

**कराल.**—(भिवया वांकड्या करून व उहूं उह
असें बोलूं नको ह्मणून डोकें हालवून खुणा

**पिंगल.**—( काश्यपाच्या हातावर हात मारून

**काश्यप**—(रामाप्रत ह्म०) तूं तुझ्या काश्यपा

**राम.**—( शंकित होऊन ह्म०) खरेंच हा काय

**मारीच.**— ( **करालाच्या** कानाशीं लागून ) काय
तें माझें तोंड ! हर्षामुळें भान न राहतां मी वेटा
लून उठलों ! तर **कराला** बापा, आतां कसें क
**कराल.**— दुसरें काय ? हरिणाचे रूपानें पळून
उपाय !

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो
'वत्सा **रामचंद्रा**. जयजयकार असो, तुझा
( सारे विस्मित होऊन पाहतात ).

**कराल व मारीच.**— ( एकमेकाच्या कानाशीं

**श्लोक.**

सीतेपरी हुतभुजीं[1] उडि घालण
येणें जयेवरि समर्पियलें पदास,
ती, रे, शिला घनकचा[2] घृतवल्
पीनस्तनी[4] मुनिवधूपरि[5] दीसता

**राम.**— हें काय आहे हो ? ( असें म्हणून मनांत
काय ! माता **कौसल्याच** मजप्रत हाक मारि
( नंतर मुनिपत्नी **अहल्या** पडद्याचे ब

**अहल्या**—

**आर्या.**

जी क्रुद्धभर्तृशापें[6] शिलात्व पावुनि पडे सु
ती मीच बा, **अहल्या** झालें त्वत्पदरजीं

**राम.**— ( मनांत म्ह० ) भगवान् **विश्वामित्र**
हिचें नाव वारंवार ऐकिलें आहे खरेंच ! (मोठ्
ति, दशरथाचा पुत्र जो **राम** तो तुझे चरण

---

टीप.—१ अग्नींत. २ दाट आहेत केश जिचे.

**मुनिपत्नी.**— वत्स, चिरंजीव.

**पिंगलकाश्यपौ**— ( उपसृत्य

नि, तत्रभवतीमावामभिवादयाव

**मुनिप॰** — वत्सावभिमतेनयुज्येथ

**रामः**— अंब, कावेतौ ?

**मुनिप॰**— पिंगल काश्यपावेव; कि

मारीचोयं, करालोयं; मायया मो

( इतिहस्तेनद

**करालमारीचौ**— ( सभयं मृगरू

**मुनिप॰**— वत्स, रघुनंदन,

ब्रावध्येतौ मृगी- भूत्वा धाव

**रामः**— अरेरे दुरात्मानौ, राक्षसापसदौ,

( इति निष्कां

**पिंगलकाश्यपौ.**— अंब, निष्कलं

सनातनगुरोर्गौतमस्यधर्मपत्नि,

दिष्ट्या गतासि निज

दिष्ट्या विदन्निशिचरौ

दिष्ट्यावयोर्ग

**अहल्या**— वत्सा, चिरंजीव हो!

**पिंगल व काश्यप**.— हे माते, भगवान् शता

परमपूज्ये, तुजप्रत आह्मी उभयतां वंदन क

**अहल्या**— वत्सांनो, तुमची अभीष्टसिद्धी होवो

**राम**.— माते, हे दोघे कोण आहेत?

**अहल्या**—**पिंगल** आणि **काश्यप**च हे खं

**आर्या**. (पूर्वार्ध).

हा **मारीच कराल**हि हा, ज्यांनीं बा, मो

(असें ह्मणून हातानें दाखवून दे

**कराल व मारीच**-(भय पावून हरिणाच्या रू

**अहल्या**.— वत्सा **रघुनंदना**,

**आर्या**. (उत्तरार्ध).

पळती मृगरूपें हे, यांतें मारून टाक श

**राम**.— अरे दुष्टांनो राक्षसाधमांनो! उभे रहा,

(असें ह्मणून निघून जातो.

**पिंगल व काश्यप**.— हे माते, तुझें महत्त्व

झें ज्ञान अगदीं कलंकरहित आहे! आणि

स्तविक स्वरूप समजलें आहे! व सन

**गौतम** त्याची तूं धर्मपत्नी होस! तुझा

आतां पहा कसें झालें तें?

**श्लोक.**

स्वरूप तुझें तुज लब्ध झालें **रामास** तूं राक्ष

तोही तयांच्या हननास गेला, आह्मासहि जी

गोष्टी अशा ज्या अजि येथ झाल्या, त्या सर्व

[illegible]

**अहल्या**—तुमचें बोलणें यथार्थ आहे. (किंचि
वत्सांनो, पहा, इतक्यांत काय झालें तें ?

### श्लोक.

करालगल तोडिला प्रभुवरें शरें जे
धनुष्यरव जाहला श्रुतिकठोर हो
त्यजून मृगरूप तो क्षितिवरी तम
पडे, तंव निजालयीं[१] बहुत हर्ष के

अणखी पहा,

### श्लोक.

मायाबळें दृष्टिपथा क्रमोनी, **मा**रीच गेला दु
ह्मणोनि चापासहि आवरोनी येतो, पहा, **रा**

(तदनंतर **राम** पडद्यांतून बाहेर

**राम.**— हें मातोश्री, दैव थोर ह्मणून आज त्व
केला हा !

**अहल्या**— वत्सा **कौ**सल्यापुत्रा,

### श्लोक.

रजें पदाच्या तव शुद्ध झालें, संपूर्ण माझें
इच्छा असे, रे, पतिसेवनाची, आज्ञा अतां दे

**पिंगलकाश्यपौ.**— अत्रापरा

**रामः**— सत्यमेवैतत्.

आविष्कृता भ

मायैव तेन जन

तत्तन्मयानुचरित

नान्यत्र, किंतु भ

तदेतन्नप्रकाशनीयं भवद्भ्यां.

**काश्य०** एवमेवमनुजमात्रस्य; नपु

मायाप्रयोगे प्रतिविधानमुपदेक्ष्यति

**रामः**- युक्तं भवानाह.

( नेपथ्ये ),

पिंगल व काश्य०.— अँः, यांत तुझ्याकडे
अपराध मारीचाच्या मायेचा होय !

राम.— खरें झालें !

### आर्या.

मातृवधें कोपुनियां मारीचें करुनि
दावियली सीता जी वाटे इंद्राहि ह
ती सत्यचि ऐसें मनिं मावुनि केलें अ
तें सर्व पुढें तुमच्या, न जाणिलें तें अ

तुह्मांला कळलें तरी चिंता नाहीं, तुह्मी ि
कोणापाशीं अक्षर बोलूं नका बरें !

काश्यप.—इतर मनुष्यापाशीं न बोलावें हें
शिक काकापाशीं सांगितलेंच पाहिजे. व
मायाप्रयोगाचा प्रसंग प्राप्त झाला असतां ते
ठवतील.

राम.— ठीकठीक, असेंच खरें !

( इतक्यांत पडद्यापलीकडे श

### आर्या.

पद.

पाहारे विपिनीं आतां, कैसी रे गडबड ह
सैनिक गर्जनेतें करिती, ऐकोनीयां सिंह
हि मेघापरी गर्जती, गगनीं उड्डाणें करि
ऐकुनी सिंहाची गर्जना, भीती झाली व
पळोनी जाती दुसऱ्या रानां, पळतां मध्ये
पाहारे विपिनीं आतां, कैसी रे गडबड ह
ओरडतां हत्तींतें ऐकुनी, मालुक पळती
त्यांना अवलोकूनी, मिवया कैसे चढवि
रोहितांचीं[1] बाळें तान्हीं घेउनि तरसें[2]
भोसकतां भाल्यांनीं, बाळें खालीं पडती
निजबाळाला पाहुनि रोहित, जवळी
वहू[3] या शब्द करित, तेणें वनास गर्जे
आतां कैसी रे गडबड होती.५ १२५

असा प्रकार ह्या वनांत आतां झाला आहे

**काश्यप.**—मित्रा, झाला आहे खराच! याव
तुझा शोक करीत येत आहे ही अटकळ ख
प्रत्येक दिशेस तसा वेळही प्रथक्व झाला

# जानकीपरिणय नाटक

## अंक ४.

पात्रें.

गंधर्व, चित्रांगदनामा ...... इंद्र
राक्षसी, उष्ट्रमुखी .. .. .. .. मं
रावण. .. .. .. .. .. राक्ष
विद्युज्जिह्व व सारण . .. .. रा
जनकराजा .. .. .. .. मि
शतानंद .. .. .. .. .. ज
जीमूतक .. .. .. .. .. ज
कौशिक .. .. .. .. .. एक
राम व लक्ष्मण . .. .. .. द
सीता व ऊर्मिला .. .. .. ज
मांडवी व श्रुतकीर्ति .. .. ज

---

( तदनंतर गंधर्व पडद्या बाहेर

गंधर्व.— स्वगत,

श्लोक.

रणीं समद ताटिका वधुनि राम
सुबाहु व कराल हे यमपुरीस हो
यमें कळवितां असें सुरपती ह्मण

वास्तव समस्त देव समुदायाच्या मस्तकावरी
चे कांतिकिरण ज्याच्या चरणरूप अरविंदा
भासतात असा जो महाराज **महेंद्र** यानें
आज्ञा केली आहे कीं, " अरे **चित्रांग**
जनाचा नाश झाल्याचें वर्तमान ऐकून
जो **रावण** तो काय विचार करीत आहे,
जाऊन शोध करून ये. ( तर्कानें ह्मणतो ).

## श्लोक.

**रामीं** असें **महेंद्रा**चा जितुका स्
त्याहूनि **रावणीं** शत्रुभाव फार दि

अहो, ह्या राक्षसाचे राजधानीच्या सर्व बाजू
सून मोठा कडेकोट बंदोबस्त आहे, त्यामुळें
होऊं शकत नाहीं. परंतु मी राक्षसाचें रूप
ला आंत जाण्यास कांहींच अवघड नाहीं.
माझ्या समोरच ही कोण बरें राक्षसी येत

## श्लोक.

उंटाचेपरि तोंड, मस्तकिं झिंट्या भीति
मोठी नौबद, लाहनी[1] कुच तिचे, वित्र
घोड्याचेपरि हात, पाय गजवत्, ऐसेपरं
दुस्थानस्थिति[2] लब्ध झालि ह्मणुनी वाई

( नंतर ) **राक्षसी** पडद्याबाहेर

**राक्षसी**.—बाबा कोणरे तूं? **कराल** आहेस किं
**गंधर्व**.—(मनांत ह्म०) उत्तर काय द्यावें याच

**राक्षसी.**—( विस्मयानें ह्म० ) तूं तर पाषाणासारिख
कांहीं भंगही नाहीं ! आणि तुझी बायको गृध्रमु
हे, आणि 'हायहाय । माझा पती रामाचा बाण ल
करूं"! असें ह्मणून ऊर बडवीत आहे, ती अजू
हीं. तशा तिच्या भोंवतीं राक्षसिणी मिळाल्या
रडारड मांडली आहे.

**गंधर्व.**—( मनांत ह्म०) हाँ ! ती करालाची बायको
आहे. (मोठ्यानें ह्म०) हें असें वर्तमान तिला कों

**राक्षसी.**— आज मारीच आला त्याची व रावण
ठ पडली नाहीं ह्मणून तो काय सांगायाचें तें प्र
आई मरण पावली ह्या दुःखानें व्याकुल होऊन
करायास गेला. तेव्हां अवघ्यांना हें वर्तमान क

**गंधर्व.**-असें काय?तर मग रावणमहाराज लंकेंत

**राक्षसी.**—होय, रे नाहींत. ह्मणून तर मंदोदरी स
व्हाच्या घरीं जाऊन, स्वामी आज कोठें गेले
ह्मणून मला पाठविलें. त्याप्रमाणें मी विद्युज्जि
पण तोही घरीं नव्हता. परंतु त्याची बायको म
ला कांहींएक वर्तमान सांगितलें.

**गंधर्व.**—काय वर्तमान तें मला सांग बरें.

**राक्षसी.**— ( मनांत ह्म०) तें तर फार गुह्य आहे.
बरें ? अथवा येथें द्वीपांतरीं लंकेंत ह्मटलें ह्मण
पक्षपाती कोणी असण्याचें संभवत नाहीं. मग
चिंता आहे ? ( मोठ्यानें ह्म०) सांगतें ऐक.
विद्युज्जिव्हानें घ्यावा, लक्ष्मणाचा वेष सारण
पण स्वतां राम व्हावें, असा विचार करून

**गंधर्व.**— तूं ह्मणतेस, तें जुळतें. **रामाच्या**
अतिशय आहे ही गोष्ट लोकांत प्रसिद्ध अ

**राक्षसी.**— ( हर्षानें म्ह० ) अरे, तूं **कराल**
पहिल्याप्रथम सर्वांचे आधीं जाऊन **गृध्र**
चें शुभवर्तमान सांगून तिजपासून कांहीं

**गंधर्व.**— अगे, उगीच इतका आनंद कसल
**कराल** नव्हे, दुसराच कोणी आहें.

**राक्षसी.**—(खिन्न होऊन ह्मणते) काय ! शेव

**गंधर्व.**— त्याविषयीं अजून संशयच आहे

**राक्षसी.**— अरेरे ! तर मग माझी मोठी नि
तूं **कराल** नाहींस तर कोण आहेस ?

**गंधर्व.**— **बिभीषणा**चा सेवक आहें.

**राक्षसी.**— बरें असो. **मंदोदरी** साहे
करायास जातें.

( असें ह्मणून निघून जा

**गंधर्व.**— आपणही हें **रावणा**कडील वर्तम
कळवून नंतर महाराज **महेंद्र** यांप्रत
( असें ह्मणून निघून जातो ).

( ही पूर्वोत्तर कथेची संग

(तदनंतर **जनक**राजा व **शतानंद** हे

**जनक**—

### श्लोक.

यावन्निशाचरपती[१] मम क
मागे न, तोंचि तिस द्यावि
ऐसें मनीं, परि मुनींद्र[२] क
किंवा न, हाचि बहु धाक

शतानंदः— राजन्नलंविचारेण

शिककुलजलधिपारिजातस्य

निष्प्रत्यूहतपःप्रसिद्धु

क्षात्राकारसुवर्णपिंडर

यःस्वर्गांतरसर्गसाहस

द्गीर्वाणांजलिपद्मकुड्म

अतः खलुनिर्वृत्तेपिसीतारामय

तीतिनशंकितव्यमस्माभिः. य

कृत्वारामं कुशिकत

ग्रामादेशप्रगुणितद्दुरा

शश्वद्विश्वत्रितयविज

रक्षोनेतुः क्षपणनिपुण

( ततःप्रविशति कौशिकल

**शतानंद**— राजा, हा धाक बाळगण्याची
**कुशिक**वंशरूप समुद्रामध्यें कल्पवृक्षा
झाला, त्या भगवान् **कौशिक**ऋषीचें
नाहीं कीं काय ?

## ओंव्या.

तपाजेंका परम दारुण, करिता झाला
तोचि धगधगीत कृशान, ज्वालामुक्त
ऐशा तपोवन्ही करोन, आटिलें क्षात्र
त्याचें ब्राह्मण्यरूप भूषण, करोनियां
जो प्रतिस्वर्गसर्गसाहसी, गीर्वाणांच्या
मुकुलित करणार शशी, सर्व जगाशी

ह्मणून **सीता** व **राम** यांचें लग्न झाल्य
करील कोण जाणे, असी आपणास शं
कारण कीं,

## श्लोक.

आर्षींच सांगोनि सुबीजमंत्रा देईल
होईल तेणें बहु शक्तिवृद्धि, वाढेल त्य
त्रैलोक्यजेता **दशकंठ** आहे, तयास
ऐसें यया क्षत्रियबाळकातें करील

( तदनंतर **कौशिका**च्या वेषानें **विद्युज्जि**
**सारण**, व **रामा**च्या वेषानें **रावण** असे

अंक ४.

**रावण.—** **आर्या.**

जे कां म्यां सांगितलें, **सुबाहु मारीच**
करितिल तीं त्या कार्या, तद्विषयीं त्यां
**सी**तावरणार्थ मियां, धारण केलें स्वरूप
परिमच्चित्त न धरितें धैर्या, यास्तव खरा

**विद्युज्जिह्व—** महाराज, भलत्याच वेळीं धैर्य

**श्लोक.**

अभिनवजलदापरि[2] हे द्युती, करयुगीं शर
नयन सुंदर पंकज कीं जसें, मुखहि पूर्ण
ऐसें तुह्मांपाहुनि हाचि **राम,** मानील **सी**
दूर्वांकुरीं युक्त मधूकमाला[3] घालील कंठीं

**रावण.—** दुसरें कांहीं मी मागत नाहीं. एक

**आर्या.**

वेणीच पाहिली म्यां, करहि तिचा हेम
आतां इतरांगेंही देखाया चित्त होतसे

**सारण—**

## अभंग.

सुवर्ण केतकी परी जीचा वर्ण, ऐसी सी
शिवाच्या जटेत जैसी चंद्रलेखा, तैसी अ

**चोबदार.**— ( आंत येऊन ह्म० ) महाराज

**जनक**—अरे जीमूतका, काय जें निवेदन

**चोबदार.**— परमपूज्य जे कौशिकऋषि
तेमान दरवाज्यापाशीं प्राप्त झाले आहेत

**जनक**—( हर्षानें व नम्रतेनें ) भगवन् गौत
करितां साहजिकपणें स्वतंत्र लोक निर्मा
ब्रह्मदेवच असा भगवान् कौशिकऋषि
त्यास अर्घ्य समर्पण करून, रघुकुमार
मान आंत घेऊन यावें.

**शतानंद**—उत्तम आहे. ( असें ह्मणून निघ

**जनक**—

## श्लोक.

माझ्यां घरीं कुशिकनंदन[1]
घेवोनियां परमपूज्य मुनींद्र अ
ऐसें असोनि मन कांपत फार
मालासें[2] मत्स्य झगटे तंव पद्म

( तदनंतर )

**शतानंद**—( आंत येतो आणि विद्युज्जिव्ह
दाखवून जनकास म्हणतो) राजन्, हें कौ
मलक्ष्मण आले आहेत.

**जनक**—( आसनावरून उठून ह्म० ) भगव
सीरध्वज हा चरणाप्रत वंदन करितो.

**विद्युज्जिह्व**— **जन**कराज, अस्तु ते कल्य

**सारण.**— ( **रावणा**कडे हळूच ह्मणतो ).

श्लोक.

**जनका**लागि कल्याण होईलचि

**सीते**ला वरुनी तुह्मी[1] जांवई व्ह

**रावण**— ( हर्षानें ह्म० ) होय. हें वास्तविक

**विद्युज्जिह्व**— ( **जन**काप्रत वंदन कर
डोळ्यानें खुणवितो ).

**रावण.**— ( **सारणा**कडे वळून हळूच ह्म

श्लोक.

दिक्पालही नमति ज्या धरुन

**मंदोदरी** प्रणयकोपित झा

तीतेंहि जो नति कदापि करी

त्याला[2] नरास नमणें ! बहु ल

**सारण**— ( मनांत ह्म० ) काय ह्याच्या
आहे पहा ! **जानकी** आपणाला मिळ
मनाचा अजूनही निश्चय होत नाहीं ! (
प्रस्तुत आपण जो मार्ग धरिला आहे, त
उचित नाहीं.

**रावण**— **जनक**रावजी, मी **दशरथपु**त्र

**सारण**— ( तसेंच ह्मणून नमस्कार करितो

**जनक**— वत्सांनो, दीर्घायुषी व्हा बरें !

**शता**०— ( **विद्युज्जिह्वा**प्रत ह्मणतो ) भ

परस्परसमावेतौ, प्र

अनयोः कतरोरामो

विद्यु०— ( स्व० ) नकश्चिदपि;

नवांबुदश्यामलएषरामो वान

सौमित्रिरेषद्रुतहेमकांतिर्यः

दशा०— ( अपवार्य सारणंप्र

मानेतुं ?

सारणः— ( स्वगतं ) अहो,

कथं ! नन्विदानीमेव जनकदु

श्लोक.

दोघे हे सारिखे मानें वयें आचरणें तसे
यांत लक्ष्मण तो कोण ? रामही को
विद्युज्जिव्ह— ( मनांत ह्मणतो ) यांत त्यांतू
रावण व सारण आहेत. ( मोठ्यानें

श्लोक.

नवांबुदश्यामल[1] राम जाण, प्रेमा जयाच
सौमित्रि हा तप्तसुवर्णकांती[3], ज्येष्ठा[4] अ
रावण— ( एकीकडे वळून हळूच सारणाप्रत
आणायास जनक आतां उगाच उशीर क
सारण— ( आपल्याशीं ह्म० ) अरे मूर्खशिरो
जनकाची भेट झाली न झाली, तोंच ह्य
झाली आहे ती ? उतावळा नवरा आणि
करितो, याला काय ह्मणावें ? ( रावणास
क्षणभर धीर धरा धीर धरा ! इतकी घाई क
रावण— ( क्रोधानें सारणास हळूच ह्म० ).

आर्या.

वधिला मुनि[1] मारीचें, ह्मणूनि तद्वाचिश
कौशिक हा, त्याणेंची, वाटे मज, हाचि
सारण— ( रावणास हळूच ह्म० ) तेंही
होईपर्यंत, पुढें नव्हे.

शतानंद- श्लोक.

झालेसाठसहस्र वत्सर वया, नाना
केलें पंक्तिरथें[1], परंतु फल तें नाहीं
केली इष्टि जईं विभांडकसुतें[2], झा
चाऱ्ही भूषणभूत सर्व जगतां, आ

विद्युज्जिव्ह—( मनांत ह्म०) हाँ ! हा अहल्

आर्या.

मारीचें रामाला वधिलें मार्गांत या
होईल दुःख तितुकें, जितुका आनं

( मोठ्यानें ह्म०) अहो, तुह्मालाच आनंद
जगालाही आनंद झाला आहे.

रावण—( सारणाला हळूच ह्म० ) सारण
ग्रहण " हीं अमृतमय अक्षरें तूं मला ऐक
झें ह्रृदय स्थिर नाहीं ! कारण परिवारांसु
हून येत आहे, त्याच्या येण्यास प्रतिबंध
ला तिकडेस योजिलें. पण तिच्यानें तें
हा मला मोठा संशय आहे ! काय करावे
( मागील स्मरण करून ह्म० ) तेव्हांच

श्लोक.

वत्सा, व्यर्थ तुझें नरांसह रण[4], स्वल
आहे कंडु तुझे भुजांत, तरि तूं देवांस
ऐसें नारदवाक्य नाइकुनि मी राजों
कैंचा तें सुत राम, तद्दूत[6] तसा सी

टीप.—१ दशरथें. २ ऋष्यशृंगानें. ३ सर्व ज

**सारणः**—( अपवार्य ) नारदगिरा मनु

थोविमुक्तइतीदमुपपन्नं. शृणुतावत्

अत्युद्दामतपःप्रसादितपुरारातिप्र

ज्योतीरूपमहास्त्रमंत्रपटलीनि

दैतेयाहवदर्शितौजसमसौ कस्य

सर्वक्षत्रियकंठकर्तनपरोवीरोजह

**दशा०**—( अपवार्य सामर्षोत्साहं ) सम्य

प्रियसुत्हृदापातयिष्यामि सहसूनुम्.

**सारणः**—( अपवार्य ) यदिताटकादिभिर

**जनकः**— भगवन्कुशिकनंदन,

अजात्मजसुतोदयः श्रवणयो

दृशोरपिचसांप्रतं मुहुरवेक्ष्यम

**सारण**— ( **राव**णास हळूच ह्मणतो ) **ना**
आपण मनुष्यांशीं युद्ध करणें टाकिलें, ते
**रथ** हा अर्थात् सुटला. हें तर नीटच आ

श्लोक.

**सां**बाला करुनी प्रसन्न परमें उग्रें त
साधी जो विविधास्त्रमंत्रपटला, उद्युक्त
सर्व क्षात्रकुलास, **भार्गव**[1] असा वी
त्यानें सोडियलें कसें **दशरथा** जो[3]

**रावण**— ( क्रोधानें व उत्साहानें **सारण**ास
स्मरण दिलें ! **भार्गव** तर माझा पर
हातानें पुत्रांसुद्धां **दशरथा**चें कांडात क

**सारण**— ( **राव**णाला हळूच ह्मणतो ) अ
**मारीच** यांनीं **राम** व **कौशिक** यां
गोष्ट कीं नव्हे ?

**जनक**— भगवंता **कुशिकनंदना**,

श्लोक.

सुपुत्र बहुतां दिनीं **दशरथास** जाले
प्रमोद तइं ऐकुनी, अजि तयांस हो
मदीयतनये सर्व जरि विवाह याचा
मलाचि न सुयोग हा **निमि**कुळास[4]

तर अहो मुनीश्वर, आपण आतां यत्नां
व्हावें. आह्मींही वत्सेचे विवाहमंगलास

**सारण**.— ( हळूच **राव**णाप्रत ) महाराज
होईल तर मग तो उत्साह याहूनही अ

**रावण**.— यांत काय संशय ?

**विद्युज्जिव्ह**.— ( मनांत ह्मणतो ) अरे हें
उभें राहिलें ? बरें असो काय चिंता आ
**कौशिका**ला मारून टाकलें असतें त
साधून घेतां येईल. नाहीं तर मग गु
( मोठ्यानें **जनका**स ह्म० ) होय, माझे

**शतानंद**— राजन्, आपली **उर्मिला** अ
णाला द्यावी.

**विद्युज्जिव्ह**.— ( एकीकडे वळून **सारण**
तुझ्याही येण्याचें फळ होणारसें दिसतें.
यात फुकट गेली.

**सारण**— ( हळूच म्हणतो ) फुकट कशानें

**श्लोक**.

शिष्ये तसे पुत्रही **कौशिका**चे घेनू स
भार्येसह प्राप्त तुलाच सारे, खेदा करीसी

**विद्युज्जिव्ह**— ( एकीकडे **सारणा**स हळू
मला देऊन मग " थेरड्या बायकोचा
दादला " असी माझी फजीतीच करा

**जनक**—भगवन् **गौतमनंदना**, **उर्मिल**
इतकेंच नाहीं, तर माझा धाकटा बंधु जो **कु**

**श्लोक**.

**भरता** आणि **शत्रुघ्ना** याच्या
**मांडवीश्रुतकीर्ती** यां दिघलें पा

**रावण**.—(**सारणा**कडे वळून हळूच) **स**

**सारण.**— ( हळूच ) अहो, **विद्युज्जिह्**
पण तो **कौशिक** वेषानें आडला गेला !
**शतानंद.**— ( **विद्युज्जिह्हा**प्रत म्ह० )
**रत शत्रुघ्नां** सहवर्तमान **दशरथ** रा
**सारण.**—( हळूच **रावणास** म्ह० ) मी म
सांगितलें कीं, बायकांमुलांसुद्धां **दशर**
**कौशिक** हा निमंत्रण करायास **अय**
णून ? पण **विद्युज्जिह्हानें** त्याप्रमाणें
काय करावें !
**रावण**— ( हळूच ) **सारणा**, जें झालें तें
**जानकी** दृष्टीस पडेल असा यत्न चा
**विद्युज्जिह्**— ( **शतानंदास** म्ह० )
परिवारासुद्धां आणिलें आहे. पण मार्गी
विलंब लागला.
**जनक**— अरे तेथें कोण आहे रे !
**चोबदार.**— ( आंत येऊन म्ह० ) महारा
**जनक**— भगवान **कौशिक**ऋषि आ
करण्याकरितां मुलींना घेऊन ये बरें.
**चोबदार**— आज्ञा महाराज, ( असें म्हण
**रावण**— ( **सारणाला** हळूच ) **सारणा**
रिला खरा. ( उत्कंठित होऊन म्हणतो

## श्लोक.

अतां माझी रामापरि तनु विलोकू
विदेहाची वधू मजवरि कटाक्षां
जयांच्या योगानें प्रणयरस हा सु

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द

## श्लोक.

**विद्युज्जिह्व**चि जाहला **कुशिकज**
झाला **सारण**, राक्षसेंद्र हि तसा **रा**
आले हे ठकवूं तुह्मां, **जनकजे** हारा
सांगावें **जनकास** त्यांनिच असें, जे

( सारे कान देऊन ऐकतात

**रावण**—(भयानें सकंप होऊन **विद्युज्जिह्वा**
हें आपलें गुप्त वर्तमान **जन**कास कोण
ह्मटलें ह्मणजे आपणाखेरीज इतर कोणाल

**विद्युज्जिह्व**— ( भीतीनें सकंप होऊन **रा**
महाराज, काय ह्मणावें आतां ? ही तर अ
आहे ! माझ्या स्त्रीला मात्र हें ठाऊक हो
कोणालाही कळलें नाहीं !

**सारण**.— ( हळूच ह्म० ) कोणी तरी दुष्ट
बिघडून टाकिली ! ( उघडपणें ह्मणतो )
कोणी आरोळी दिली याचा शोध करावा

**शतानंद**— ( मनांत ह्म० ) हें कसें झालें ?
**विद्युज्जिह्व** हे तिघे **रामलक्ष्मण** व
घेऊन आले आहेत ह्मणजे काय ? ( मो
**लक्ष्मणा**, शोध करवितों.

**जनक**.— ( विचारपूर्वक मनांत ह्म० ).

## अभंग.

माझा मनोरथ साधोनी द्यायाला, कौ

( मोठ्यानें बोलतो ) कोण आहे रे तिकडे ?
**चोबदार.**— ( आंत येऊन ह्म० ) आज्ञा महा
**जनक.**— आतां हें कोणी आरोळी मारून सां
करून इकडे कळीव.
**चोबदार.**— महाराज, शोध करण्याजोगें कांहि

## आर्या.

स्वर्गीं उडून गेला दिव्यपुरुष एक बोलुनी
आले द्वारीं दुसरे **कौशिक, सौमित्र,**
**जनक.**— भगवंता **शतानंदा,** हें काय आहे
**शतानंद**— ( एकीकडे वळून **जन**काप्रत हळू
दूतानें हें सांगितलें असेल असें वाटतें ! अ
आणि येणारे यांतून सत्य कोणते याची परीक्ष
करूं. ( उघडपणें **विद्युज्जिव्हा**प्रत ह्म० )
**नंदना,** हें कसें काय आहे ?
**विद्युज्जिव्ह**— ( मनांत ह्म० ) **कौशिका**नें अ
चोर कोंडावे तसें कोंडून टाकिलें. काय करा

**दशा०**— ( अपवार्य विद्युज्जि

**विद्यु०**— ( अपवार्य दशान

रोधायसर्वमवेक्षमाणायथोचि

**जन०**— ( अपवार्य शतानंदंप्र

तथामन्येराक्षसाएवागमिष्यंत

**शता०**— ( अपवार्य ) ममाप्यय

**विद्यु०**— जनकराज, किंविच

क्तमेव. यथोचितंसंभावनीये

इतिवादीः.

**जनकः** ( तथेत्युत्थायप्रांजलिः पंथ

( दशाननादयउत्थायनिष्क्रांता

**रावण**— **विद्युज्जिव्हास** हळूच म्ह० ) अ
वें बरें ?

**विद्युज्जिव्ह**— ( **रावणास** हळूच म्ह० ) ि
बळानें गुप्त होऊन येथें काय होतें तें सर्व
दिसेल तें करावें, दुसरें काय ?

**जनक**— ( **शतानंदा**कडे वळून हळूच म्ह
उद्विग्न होऊन आपापल्यांत बोलत आहे
नव्हत; तर जे येणारे तेच राक्षस होत असे

**शतानंद**— ( **जनका**कडे वळून हळूच
असेंच वाटतें.

**विद्युज्जिव्ह** — **जनक**राजा, आतां विचा
नाहीं. आह्मी येथून जातों ह्मणून तुह्माला
**रावण** येईल, त्याचा सत्कार चांगला करा,
गणें कांहीं नाहीं. परंतु 'तुला कन्या देतों' अ

**जनक**— बरें आहे, तसेंच करीन. ( असें
जोडून ह्मणतो ) यावें महाराज, हाच म
दाखवितो ).

( **रावण, विद्युज्जिव्ह** आणि **सारण** हे उ
णि तिरस्करिणी विद्येच्या बळानें गुप्त होऊन

**शतानंद**— राजन्, दुसरे **कौशिका**दिक ब
नाही यथोचित अर्घ्य देऊन आंत घेऊन
बाहेर जातो ).

( तदनंतर **रामलक्ष्मणां**सहवर्तमान **कौ**

**कौशिक**— ( मनांत म्ह० ).

जानक्यां रघुनंदनस्य त्दृदयं लग्नं दृढं कारितं,

यूनोःकिंनपरस्परप्रणयिनोर्योगः प्रशंसास्पदं १

दृष्ट्वास्यप्रगतं रघूद्वहमिमं सीता सखीसेविता

नन्वेषानवपल्लवास्तरगता नक्तंदिवंताम्यति. ३०

किंच अस्माभिः सुविहितमिदानीं जृंभकप्रमुखदिव्यास्त्रमंत्रग्राम-मुपदिशद्भिरेतस्मैसलक्ष्मणायरामाय. यदस्मिन्स्वजनविनिपातेन सीतापाणिग्रहणेनच जनितामर्षेपि नाक्रमेत पराक्रमस्त्रिभुवनवि-जयोदग्रतेजसोपि दशग्रीवस्य. अपिच.

मायाविनोरात्रिचरान्विदित्वा

विश्लिष्टवान्पंक्तिमुखेनराज्ञा

निर्विघ्नमुद्वाहकृतेकुमार्याः

स्वस्थानमाप्यांद्रुतमागतोस्मि. ३१

(प्रकाशं) वत्सौ रामलक्ष्मणौ, जनकराजंप्रतिभवद्भ्यां प्रश्रिताभ्यां भवितव्यं. यतः

याज्ञवल्क्याद्दषेरेषप्राप्योपनिषदोगुरोः

तीर्णशोकार्णवः पूज्यःसर्वेषामपियोगिनां. ३२

**रामलक्ष्मणौ—** बाढमेवंभवावः.

### श्लोक.

रामीं प्रीति अखंड मी जडविली पृथ्वीसुतेची बरी,
त्यांचा स्तुत्य न योग, हार्द[1] करिती जें एकमेकावरी १
स्वमीं पाहुनि राघवास विरहें तप्ता सखीयुक्त कीं
पाल्याचे शयनीं निजे, निशिदिनीं भोगी व्यथा, जानकी.

दुसरें, आम्ही रामलक्ष्मण या उभयतांसही जृंभकादिक दिव्यास्त्रांचे मंत्राचा उपदेश केला, हें ठीकच केलें. कारण, स्वजनाचा नाश झाल्यामुळें आणि सीता व राम यांचें लग्न झाल्यामुळें रावणास मोठा क्रोध जरीं आला, आणि मूळचाही तो त्रिभुवनास जिंकणारा असा मोठा पराक्रमी आहे, तरीं, त्याचें रामापुढें कांहीं चालूं नये, असें या अस्त्रांचे योगानें रामास सामर्थ्य आलें आहे. आणखी,

### आर्या.

मायावी रावण हा याची आणी विदेह राजाची
संगति न होय ऐसी केली यत्नेंचि युक्ति मी साची.
आतां निर्विघ्नपणें विवाह यांचा करोनि द्यायाला
घेउनि आलों सत्वर निजाश्रमीं या नरेंद्रतनयाला.

( मोठ्यानें स्म० ) वत्सांनो, रामलक्ष्मणांनो, तुह्मी जनकराजाप्रत फार नमून असावें बरें, कांकीं,

### श्लोक.

याज्ञवल्क्योपदेशानें तत्वज्ञानीच जाहला,
गेला शोकार्णवा पार योग्यांही पूज्य तो भला.

रामलक्ष्मण.— उत्तम आहे, आह्मी नमूनच असूं.

---

टीप.–१ प्रीति.

लक्ष्मणः— भगवन्नेतस्य राज्ञोलांगलोल्लिखितभूमेरुत्थिता सीतानाम तनयेति महदिदमाश्चर्यमाकर्ण्यते.

कौशिकः— अथकिं. १

रामः— ( स्व० सानुस्मरणं )

तन्वंग्याः पतनं तथाहुतवहे मायेतिनिश्चिन्वतो-
प्यातंकेनचमन्युनाचहृदयं नोन्मुक्तमद्यापिमे,
मिथ्याभूतमपिव्यतिक्रममिमंस्मृत्वाविदेहाधिपे
पौलस्त्यस्य शिरांसिसंयतिदशाप्युच्छेत्तुमुत्कंठते. ३२

अपिच

वैतानंव्यपदिश्यकर्मवसुधाकन्याविवाहोत्सवं
निर्वोढुंसहसासमानयतिमांसर्वैः समंबंधुभिः
आर्यःश्रीकुशिकात्मजोयमितिमे चेतः कथंवर्तते,
ध्यायत्याश्वसिति, प्रसीदति, तथास्वच्छंदमानंदति. ३३

( प्रकाशं ) भगवन् इदमन्यदद्भुतमाकर्ण्यते, यत्पुनरनल्पतपसो विदेहाधिपतेरायतने सकलसुरासुरमवीरवुरारोपगुणं, गिरिवरप्रमाणं, भगवतः पुरशातनस्य शरासनमभ्यर्च्यतइति.

कौशिकः— ( विहस्य ) अस्त्येतदपि. ( इतिपरिक्रामंति )

( प्रविश्यशतानंदः )

शतानंदः — राजन्नेषभगवान्कुशिकनंदनः, एतौचदशरथराजनंदनौ.

आहे. हें तर मोठें आश्चर्य होय !

**कौशिक**—होय, तें खरेंच आहे.

**राम**— ( मागील स्मरण करून मनांत ह्मणतो ).

### श्लोक.

गेली अग्निमधें जळूनि तरुणी मायाश्व ती, हे खरी,
जाणें मी बहु शोकरोपहि तसा सोडी न चित्ता तरीं.
**वैदेहा**[1] वधि[2] राक्षसेंद्र लविकें हें सर्व जाणोनि रे,
छेदाया दशही शिरें मन कसें झालें असे घाबरें ?

आणखी

### श्लोक.

यज्ञाचें मिष दाखवूनि वसुधाकन्यां विवाहोत्सवा
आणी येथ मला मुनीश्वर अजी तैसेंचि मद्बांधवां,
**सीताही** मज लब्ध होइल अतां, येतां असी कल्पना,
ध्यानाश्वासनहर्षतोषें इतुक्या होती मनीं भावना.

( मोठ्यानें ह्मणतो ) भगवन्, दुसरी एक आश्चर्यकारक गोष्ट ऐकतों, ती ही कीं, सकल सुरासुरांतील महावीरांस देखील ज्याचें गुणारोपण करणें अशक्य, असें पर्वताकार जें त्रिपुरासुरजेता भगवान् **शंकर** याचें धनुष्य, तें या महातपस्वी **जनक**राजाच्या घरीं पूजेंत आहे।

**कौशिक**— ( हांसून ह्म० ) होय, हीहि गोष्ट खरीच आहे. ( असें बोलून सारे इकडे तिकडे फिरतात ).

**शतानंद**— ( आंत येऊन ह्मणतो ) राजन्, हे भगवान् **कौशिक** ऋषी आणि त्यांच्या बरोबर **दशरथ**राजाचे पुत्र असे तिघे आले आहेत.

---

टीप.–१ जनकाला. २ मारिता झाला. ३ रावण. ४ सीता. ५ चिंताधैर्य.

जनकः— ( स्व० ) एतेह्विवेषानुगुणमनेन पुरोधसा निर्दिष्टाः. ( प्र० ) प्रियंनः. ( इतियथोचितमुपचरन्सर्वानासनेपुनिवेशयति. )

शतानंदः — ( स्व० ) सत्वेते राक्षसास्तथाप्येवंवक्ष्ये. (प्र०) दिष्ट्या रामलक्ष्मणाभ्यामत्र भवान्संप्राप्तः.

जनकः—( स्व० ) अहमपिशतानंदमनुसृत्यवक्ष्ये. ( प्रकाशं )

दिष्ट्यानयद्दशरथो गृहमृष्यशृंगं,

दिष्ट्यासएवतमथाजयद्वृद्धिकामः,

दिष्ट्यासुताः समभवन्पुनरस्यराज्ञो,

दिष्ट्याममातिकमिमौभवताप्रनीतौ. २४

दशा० —विद्युज्जिह्व कथमयं परमार्थबुद्ध्याकथयति ।

विद्यु०—अस्मास्वेवसा जनकस्येति प्रतिभाति.

कौशिकः— एवमेवैतत्. इदंपुनःश्रूयतां शतानंदेन अनेनचमुहृदाजनकराजेन.

उभौ— अवहितौस्वः.

दशा०— किंकथयत्येषदुरात्मा कौशिकापसदः ।

विद्यु०— प्रायेणनिरुद्धतमस्मत्परिजनमतिसंप्रायागतोस्मीति.

सारण०—कथमन्यथा तद्भिसंधानमंतरेणायमागंतुं शक्तःस्यात्. १

**जनक**— ( मनांत ह्मणतो ) ठीकच आहे. यांचे जसे वेष व रूपें आहेत तदनुरूपच आपल्याला उपाध्याय बावांनीं सांगितलें. ( मोठ्यानें ह्मणतो ) फार चांगलें, हें तर आह्मास इष्टच आहे.

( असें ह्मणून सर्वांना यथायोग्य आसनावर बसवितो ).

**शतानंद**— ( मनांत ह्मणतो ) हे राक्षस असले तर असोत. पण आतां असें बोलतों. ( मोठ्यानें **कौशिका**स ) देव थोर ह्मणून आपण **राम**लक्ष्मणांस घेऊन आलांत.

**जनक**— ( मनांत ह्मणतो ) मीही आतां **शतानंदा**स अनुसरूनच बोलतों. ( मोठ्यानें **कौशिका**स ).

## श्लोक.

आणोनियां **दशरथें** मुनिऋष्यशृंगा,
त्याच्या करें करविलें स्फुट पुत्रयागा,
झाले सुपुत्र, तुमच्या सह येथ आले,
हें सर्व कृत्य विधिनेंच, मुनींद्र, केलें.

**रावण**— **विद्युज्जिव्हा**, हा जें बोलतो तें परमार्थबुद्धीनेंच बोलतो. कीं कसें रे ?

**विद्यु०**— महाराज, **जनका**ची परमार्थबुद्धि ह्मटली ह्मणजे आपणाविषयींच आहे असें मला वाटतें.

**कौशिक**—(**जनकास** ह्म०) होय असेंच खरें. हे **शतानंदा** तूं, हे मित्रा **जनक**राजा तूंही, मी जें वर्तमान सांगतों तें ऐकून घ्यावें.

**जनक व शतानंद**-ठीक आहे सांगावें. आह्मी ऐकायास तत्पर आहों.

**रावण**— हा दुष्ट **कौशिक** आतां काय सांगत आहे कोण जाणे ?

**विद्यु०**— **ताटिका**, **मारीच** वगैरे आपल्या राक्षसमंडळीनें आडविलें असतां त्यांना टाळून निघून आलों, हेंच बहुधा सांगेल. दुसरें काय ?

**सारण**— ठीकच आहे, टाळाटाळी केल्याशिवाय **कौशिका**चें येणेंच व्हावयाचें नाहीं.

कौशिकः—

यज्ञोमे भवितेति कोशलपतिर्दारैः सुतैश्चानयन्

रुद्धस्ताटकयास्मि वर्त्मनि रजोवृष्टिं सृजंत्या भृशं

दशा०— ( स्व० ) सम्यगुपक्रांतं अनया मयत्या.

विद्यु०— तदभिसंधानंतु श्रोतव्यम्.

दशा०— मयापुनर्हर्षपरवशेनाभ्यां रघुशिशुभ्यामस्यमुनेरागमनमेव विस्मृतं.

कौशि० ( तृतीयचरणः )

धत्सेस्त्रीतिपराङ्मुखेप्युदपतद्बाणः स्वयं कार्मुकात्

विद्यु०— कियानस्यमुनिपाशस्य क्षत्रियबटावस्मिन्माहात्म्यमारोपयितुंयत्नः ।

सारणः—( साशंकं ) ततः किंवृत्तं तत्शृणुमः.

कौ० ( चतुर्थचरणः )

भिन्नातेन भुजांतरे महति, सा जीवं जहावंजसा.३५

जनकः— ( अपवार्य शतानंदंप्रति ) नूनंनिजगृहीतरूपप्रत्ययदृढीकरणार्थमनेनयातुधानेन कथेयंप्रस्तूयते ।

कौशिक—

श्लोक.

यज्ञाला अजितां सदारतनयां राजास, ती ताटका

रोधाया मज धूळिची करितसे वृष्टी पथीं बाधका,

रावण— ( मनांत ह्म० ) वाहवा ! तिनें खासें काम चालविलें हें !

वायु०— तिच्याशीं टाळाटाळी कसी केली तो प्रकार आतां ऐकावा.

रावण— अरेरे ! तिनें धुळीची वृष्टी केली इतकेंच ऐकून, हर्षांत गरक झालों, यामुळें हा मुनी ह्या पोरास घेऊन आला याचें भानच राहिलें नाहीं !

कौशिक—

श्लोक.

( तृतीयचरण ).

झाला स्त्री ह्मणुनी पराङ्मुख जईं, तेव्हां तयाच्या शरें

वायु०— या बेट्या क्षत्रियाच्या पोराचें नसतें महत्व सांगण्याविषयीं या दुष्ट मुनीचा, पहा, केवढा यत्न आहे तो !

रावण— ( शंकित होऊन ह्म० ) बरें आतां पुढें हा काय सांगतो कोण जाणें ! तें ऐकावें.

कौशिक—

श्लोक.

( चतुर्थचरण ).

केली भिन्न भुजांतरींच[२] मग ती प्राणास सोडी त्वरें.

जनक— ( शतानंदाकडे वळून हळूच ह्म० ) आपण जीं रूपें घेतलीं आहेत तीं खरीं आहेत असें पक्कें भासावें म्हणून या राक्षसानें ही कथा सांगून बतावणी केली, यांत संशय नाहीं.

टीप.—१ स्त्रीपुत्रांसहित. २ हृदयाच्या मध्यभागीं.

शता०— अथवा दैवयोगेन कस्याकिंदुष्करं भवेत् ?

विद्यु०— समर्थयतेऽयमांगिरसहतकः

सार०—हा ताटके, स्त्रीति विजानतापिनमुक्तासि कथमनेनजाल्मेन.।

दशा०— ( सातंकं ) किंकृतं तदनुचरैर्नजानीमः

जनकः— ततःततः ?

कौशिकः — ततश्चसुबाहुमारीचप्रभृतयो रजनीचराः यत्समभ्यद्रवन्.

दशा०— कथं ताटकावधंते सहिष्यंते. ?

सारणः— कथंतेष्वप्याचरितं वीरमानिनाराघवबटुना ?

कौशि०— श्रूयतां. किमन्यत्. ?

सुबाहुतदनीकिनीचरनिशाचरच्छेदिना

रघुप्रवरपत्रिणारणतले तयाक्रीडितं,

नटंतिपरितो यथाहतकबंधतन्मस्तकैः

समंपिशितदर्पिताः सपदिकंकगोमायवः. ३६

शता०—( अपवार्य जनकंप्रति ) एवमपिस्थिते कथमेषुमन्यसे ?

जनकः— (अपवार्य ) वत्सा वीर्यशुल्का प्रतिज्ञातेत्येति.

**ता०**— ( **जन**कास हळूच म्ह० ) अथवा दैवयोगानें कोणाला काय दुष्कर होणार आहे ? तसेंही होईल.

**यु०**— हा दुष्ट **शतानंद** पहा कसा साधून नेत आहे तें ?

**रण**— हा **ताटके** ! स्त्री असें समजलें असतांही त्या दुष्टानें तुला सोडिलें नाहीं ना ?

**वण**—(भय पावून) मग तिच्या सेवकांनीं काय केलें असेल तें असो.

**नक**— **ताटका** मरण पावल्यावर मग काय झालें महाराज ?

**शिक**— मग **सुबाहु** व **मारीच** इत्यादिक राक्षसांनीं **रा**मावर चालून येऊन त्याला वेढून घेतलें.

**वण**— नीचच आहे ! **ताट**केला मारिलें हें त्यांना कसें बरें सहन होईल !

**रण**— मग वीरमानी जो **राघव** बटु त्यानें त्यांचें काय केलें असेल तें असो !

**कौशिक**— दुसरें काय ? हें,

श्लोक.

> **सुबाहु** सहिता निशाचरचमू तयांची महा
> रघूद्वहशरें रणीं निवटिली क्षणार्धे पहा.
> गिधाड तंव माजती पिशित खाउनीयां नवें,
> सृगालगण नाचती मदभरें कबंधांसवें.

**शता०**— ( **जन**कास हळूच म्ह० ) हा पराक्रम ऐकिलातना ? आतां हे खरे आहेत किंवा वेषधारी आहेत व यांना वत्सा द्यावी किंवा नाहीं याविषयीं आपल्या मनांत कसें येतें ?

**जनक**— ( **शता**नंदास हळूच म्ह० ) तोंडच्या गोष्टी ऐकून उपयोग नाहीं. येथें समक्ष जो पराक्रम करून दाखवील, त्याला वत्सा मिळेल, असी कांहीं प्रतिज्ञा करावी असें मला वाटतें.

शता०—( अपवार्य ) कीदृशः पणबंधः ?

जन० —( अपवार्य ) शिवचापारोपणमेव.

शता०— ( अपवार्य सावज्ञं विहस्य )

निषेवाहे वाकमसृमरसमस्तामरकुलं,

चलन्मेरुप्रायप्रमथगणसांद्रीकृततटम्,

कराग्रैः कैलासं गिरिमधिनभोनर्त्तितवतः

कियान्रक्षोनेतुर्गिरिशधनुरारोपणविधिः । ३७

जनकः—( अपवार्य ) कथयामि ते भूतार्थं,-

सिद्धचारणगंधर्वदेवदानवराक्षसैः

दुरारोपमवादीन्मे पुरा चापमिदंहरः. ३८

शता०—( अपवार्य ) तर्हिशक्यमिदंप्रतिज्ञातुं.

विद्यु०— कथंसर्वेषामाहवधं कौशिकः ?

सारणः—सत्यमेवैतत्, नखल्वतिसंधेयाः केनापिमायाविनोमारीचप्र-

भृतयः.

**शता०**— ( हळूच म्ह० ) त्याला तर पण केला पाहिजे. तो कोणता करावा बरें !

**जनक**—( **शतानंदास** हळूच म्ह० ) **शिव**चापारोपण करील तोच हिचा पती. हाच, दुसरें काय ?

**शता०**—( अवज्ञापूर्वक हांसून **जनका**प्रत हळूच म्हणतो ) अँः, ही काय प्रतिज्ञा ? **रावणा**ला तर अगदीं सुकर आहे ही;

**श्लोक.**

मिळाले सेवार्थ त्रिदिवपति[1] सारेचि वहिले,
चलन्मेरुप्राय[2] **प्रमथ**गण ही ज्यावरि भले,
अशा **कैलासाला** उडवि गगनीं जो निजकरें,
तया **लंकानाथा** धनु उचलणें काय वद रे ?

**जनक**— ( हळूच म्ह० ) तें खरें पण पूर्वीं असें झालें आहे.

**श्लोक.**

सिद्धचारणगंधर्वदेवदानवराक्षसां,
दुरारोपचि[3] हें चाप, **सांब** हें वदला असा.

**शता०**— ( हळूच **जनकास** म्ह० ) असें आहे काय ? तर मग ही प्रतिज्ञा ठीक आहे.

**विद्यु०**— ( **कौशिक** वाक्यावर म्ह० ) काय ! **कौशिका**नें तर सर्व राक्षस मारून टाकिले म्हणून सांगितलें !

**सारण**— होय ही गोष्ट खरीच असेल. कांकीं **मारीच** प्रमुख राक्षस हे मोठे मायावी आहेत, त्यांशीं टाळाटाळी करून म्हणजे कोणी निभावून येईल असें व्हावयाचें नाहीं. म्हणून ते राक्षस मेले असतील, तेव्हांच हे इकडे आले, मध्यें नाहीं.

---

टीप.—१ त्रिदिवेश ( देव ). २ चालणाऱ्या मेरुपर्वताप्रमाणें मोठाले. ३ गुण चढविण्यास दुःसाध्य.

